पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिकेच्या क्षेत्रातील रस्ते विकासासाठी S.P.V.(Special Purpose Vehicle) स्थापन करुन नोंदणी करण्यास मान्यता मिळणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांकःपीसीसी-३००८/१५६३/प्रक्र-५०० /नवि-२२

मंत्रालय, मुंबई-४०००३२ दिनांक - ५ जानेवारी, २०१०

वाचा : १) आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर मनपा, पिंपरी यांचे पत्र क्र. स्था/ शअ/ पीए/ ५५/०८, दि. २४.०९.२००८ व त्यासोबतचा ठराव क्र. ४५२ आणि क्रिसिल इन्फ्रास्ट्रक्चर ॲडव्हाइझरी कंपनीचा अहवाल.

२) आयुक्त, पिंपरी चिंचवड मनपा, पिंपरी यांचे पत्र क्र. कक्ष-कावि-२८२-०८, दि. २५.११.२००९

**प्रस्तावना :-** पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेच्या क्षेत्रातील रस्ते विकसित करण्यास जवाहरलाल नेहरु नॅशनल अर्बन रिन्युअल मिशन (जे.एन.एन.यु.आर.एम.) या कार्यक्रमांतर्गत मान्यता मिळाली असून, त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या नगर विकास मंत्रालयाच्या खात्याच्या मार्गदर्शक सुचनांनुसार पिंपरी चिंचवड महानगरपालिका क्षेत्रातील रस्ते विकास आणि पायाभूत सोयी सुविधांसाठी क्रिसील या संस्थेने C.M.P. (Comprehensive Mobility Plan) अहवाल तयार केला आहे. सदर अहवालामध्ये मास ट्रान्सपोर्टसाठी शहरातील एकूण ८ रस्त्यावर B.R.T.S. व ४ रस्ते फिडर रुट म्हणून सुचविले आहेत. अशा एकूण १२ रुट्च्या रस्त्यांच्या विकास कामांसाठी निधी उभारणे व कामे पूर्ण करण्यासाठी महापालिका सभेने मान्यता दिलेली आहे. उक्त रस्ते प्रकल्प व इतर पायाभूत सुविधा विकसित करण्यासाठी केंद्र सरकारकडून मिळणाऱ्या अनुदानाखेरीज महानगरपालिकेस १) मोठ्या प्रमाणात निधी उभारणे व खर्च करणे गरजेचे आहे. २) अशा प्रकारच्या पायाभूत सुविधा विकसित करण्यासाठी अनुभवी व्यावसायिकांची/विशेषज्ञांची आवश्यकता भासणार आहे. ३) G.O.I. च्या मार्गदर्शक सुचनेनुसार नागरी वाहतूक निधी (Urban Transport Fund) ची स्थापना करणे गरजेचे आहे. या सर्व बाबींसाठी पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेच्या पूर्ण अखत्यारीतील S.P.V. (Special Purpose Vehicle) ची भारतीय कंपनी कायदा १९५६ च्या तरतुदीनुसार स्थापना करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने अशा प्रकारची S.P.V. स्थापन करण्यास महापालिका सभा दि. १९.९.२००८ रोजी ठराव क्र. ४५२ नुसार महासभेने मान्यता दिलेली आहे. सदरील ठरावानुसार प्रकल्पाच्या खर्चास, प्रकल्पाच्या स्वरुपास,

S.P.V..साठी वित्त उभारण्याचे पध्दतीस संभाव्य संचालकांची नावे आणि या S.P.V. ला "पीसीएमसी इन्फ्रास्ट्रक्चर कंपनी" असे संबोधण्यास महासभेने मान्यता दिलेली आहे.

पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका क्षेत्रातील रस्ते व इतर अनुषंगिक पायाभूत सोयी सुविधा यांच्या विकासासाठी भारतीय कंपनी कायदा १९५६ च्या तरतूदीनुसार S.P.V. स्थापित करुन नोंदणी करण्यास आणि या S.P.V. ला "पीसीएमसी इन्फ्रास्ट्रक्चर कंपनी " या नावाने संबोधण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम, ६६ व ६६ (४१ अ) अन्वये मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी यांनी संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला आहे, त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

०१. आयुक्त, पिंपरी- चिंचवड शहर महानगरपालिका पिंपरी यांनी महासभा ठराव क्र. ४५२ दि.. १९.९.२००८ च्या अनुषंगाने सादर केलेल्या प्रस्तावातील तपशिल विचारात घेता, पिंपरी- चिंचवड शहर महानगरपालिकेच्या हद्दीतील रस्ते प्रकल्प व इतर अनुषंगिक पायाभूत सोयी सुविधा यांच्या विकासासाठी भारतीय कंपनी कायदा १९५६ च्या तरतूदीनुसार पुढीलप्रमाणे S.P.V. ( Special purpose Vehicle ) स्थापन करुन नोंदणी करण्यास आणि या S.P.V. ला " पीसीएमसी इन्फ्रास्ट्रक्चर कंपनी" या नावाने संबोधण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम -१९४९ चे कलम ६६ व ६६ (४१ अ) अन्वये प्राप्त अधिकारात या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर S.P.V. चे संचालक मंडळ खालीलप्रमाणे राहील:-

| | | |
|---|---|---|
| १. | मा. महापौर, पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे | अध्यक्ष |
| २. | मा. अध्यक्ष, स्थायी समिती, पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे | सदस्य |
| ३. | मा. विरोधी पक्षनेता, पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे | सदस्य |
| ४. | मा. पक्षनेता, सत्तारुढ पक्ष, पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे | सदस्य |
| ५. | जिल्हाधिकारी, पुणे, जि. पुणे | सदस्य |
| ६. | आयुक्त, पुणे महानगरपालिका,पुणे | सदस्य |
| ७. | अध्यक्ष तथा व्यवस्थापकिय संचालक, पुणे महानगर परिवहन महामंडळ मर्या.पुणे | सदस्य |
| ८. | आयुक्त, पिंपरी- चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी ,पुणे | कार्याध्यक्ष |
| ९. | शहर अभियंता, पिंपरी- चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी ,पुणे | सदस्य |
| १०. | कार्यकारी अभियंता, पिंपरी- चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी ,पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ११. | पिंपरी चिंचवड शहरातील दोन प्रतिष्ठित नागरीक | सदस्य |
| १२. | जे.एन.एन.यु.आर.एम. समन्वयक (स्थापत्य) | सदस्य |

०३. संचालक मंडळावरील उपरोक्त अ.क्र. ११ येथील पिंपरी चिंचवड शहरातील दोन प्रतिष्ठित नागरीक या दोन सदस्यांची निवड शासनाच्या पूर्व संमतीने आयुक्त, पिंपर चिंचवड शहर महानगरपालिका हे करतील.

०४. सदरील S.P.V. (Special Purpose Vehicle) मध्ये शासनाच्या पुर्वनान्यतेने समभागाच्या सहभागाची (Equity Participation) ची सोय राहील.

०५. सदर कंपनीच्या निर्णयाचे पुनर्विलोकन करण्याचे अधिकार शासनाने राखून ठेवलेले आहेत.

०६. ज्यावेळेस सदरील कंपनीचे रस्ते विकासाचे काम संपेल त्यावेळी सदरील कंपनी शासनाच्या मान्यतेने संपुष्टात आणण्याची तरतूद कंपनीच्या उपविधी (By-laws)मध्ये करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. महापौर, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
३. मा. अध्यक्ष, स्थायी समिती, पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
४. मा. विरोधी पक्षनेता, पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
५. मा. पक्षनेता, सत्तारुढ पक्ष, पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
६. मा. सचिव (नवि -२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
८. जिल्हाधिकारी, जिल्हा, पुणे
९. आयुक्त, पुणे महानगरपालिका,पुणे
१०. आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
११. अध्यक्ष तथा व्यवस्थापकिय संचालक, पुणे महानगर परिवहन महामंडळ मर्या.पुणे
१२. शहर अभियंता, पिंपरी- चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी ,पुणे
१३. कार्यकारी अभियंता, पिंपरी- चिंचवड शहर महानगरपालिका,पिंपरी ,पुणे
१४. निवडनस्ती, नवि- २२